राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमाची अमलबजावणी करण्याकरीता जिल्हा स्तरावर समन्वय अधिका-यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र. ४०५/आरोग्य ३अ**
गो.ते.रुग्णालय आवार, १० वा मजला
संकुल इमारत, मुंबई ४०० ००१.
दिनांक: १८ जानेवारी,२०१९

वाचा -

१) **सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांक - संआसे/NCD/नक्र. २१७-A/जिल्हा/नोडल ऑफीसर/३९५८/१८ दि. ५/११/२०१८**

**शासन परिपत्रक -**

राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमातंर्गत खालीलप्रमाणे आरोग्य विषयक कार्यक्रम राज्यातील ३४ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत आहे.

(१) राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हदयरोग व पक्षाघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम.(NPCDCS)
(२) राष्ट्रीय वृध्दपकाळ शुश्रुषा कार्यक्रम (NPHCE)
(३) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम (NPCB)
(४) राष्ट्रीय मानसिक आरोग्य कार्यक्रम(NMHP)
(५) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम (NTCP)
(६) राष्ट्रीय मौखिक आरोग्य कार्यक्रम (NOHP)
(७) राष्ट्रीय पॉलिएटिव्ह केअर कार्यक्रम (NPPC)
(८) राष्ट्रीय कर्णबधिरता प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम (NPPCD)

या कार्यक्रमाची व्याप्ती पुढील कालावधीत वाढण्याचे शक्यता असल्यामुळे या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यामध्ये प्रत्येक जिल्हयात विविध स्तरावर करण्यात येत आहे. तथापि, यासाठी जिल्हास्तरावर स्वतंत्र यंत्रणा अस्तित्वात असल्याचे दिसून येत नसल्याने, या कार्यक्रमांची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्यासाठी जिल्हा शल्यचिकित्सक व जिल्हा आरोग्य अधिकारी यांचा प्रत्यक्ष सहभाग अत्यावश्यक आहे.

राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमाची योग्य रित्या अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने जिल्हास्तरावर समन्वय अधिकारी, असंसर्गजन्य रोग (NCD) यांची खालील प्रमाणे नेमणुक करण्यात येत आहे.

| अ.क्र | आरोग्य विषयक कार्यक्रमाचे स्तर | समन्वय अधिकारी यांचे पद |
|---|---|---|
| १ | जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालयात राबविण्यात येणारे एनसीडी कार्यक्रम | संबंधीत अतिरिक्त जिल्हा शल्य चिकित्सक |
| २ | जिल्हा शल्य चिकित्सक यांच्या अंतर्गत उपजिल्हा ग्रामीण रुग्णालयाकरीता राबविण्यात येणारे एनसीडी/कार्यक्रम MOH यांच्या अधिनस्त area मधील NCD | |
| ३ | जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या अंतर्गत आरोग्य संस्थामध्ये राबविण्यात येणारे एनसीडी कार्यक्रम | संबंधीत अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी |

वरील तक्यात नमूद करण्यात आलेल्या समन्वय अधिकारी यांनी राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमा अंतर्गत येणा-या विविध आरोग्य विषयक कार्यक्रमाची काटेकोरपणे अमंलबजावणी करण्यासाठी प्राथम्यांने लक्ष पुरवूण आवश्यक ती कार्यवाही करावी. तसेच याबाबतचा मासीक आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल आरोग्य सेवा संचालनालया मार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८११३७४२६८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443e8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2019.01.21 11:42:02 +05'30'

**रा.शा.कौरते**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय.

२. संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ ठाणे / पुणे/ नागपूर / कोल्हपूर / औरंगाबाद /नाशिक/अकोला/लातुर .
६. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय
७. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी,
८. निवड नस्ती आरोग्य ३अ

**प्रत माहितीस्तव**

१. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुंटुंब कल्याण, महाराष्ट्र राज्य.
२. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुंटुंब कल्याण, महाराष्ट्र राज्य.